भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांनी विहित केलेल्या MAS नमुना क्र. १ ते ८ मध्ये सर्व जिल्हा परिषद पंचायत समिती व ग्रामपंचायतीचे मासिक / वार्षिक लेखे ठेवणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## ग्राम विकास विभाग
## शासन परिपत्रक क्रमांकः एमएएस २०१६/ प्र.क्र.४३/वित्त ६

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
तारीख: ०४ मार्च, २०१७

<u>वाचा:-</u>

१) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक: एमएएस २०१३/ प्र.क्र.१४/ वित्त ६, दि. ५/१०/२०१३.
२) शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक: एमएएस २०१५/ प्र.क्र.१७/ वित्त ६, दि. १५/९/२०१५
३) उप महालेखापाल यांचे पत्र क्र.**SS-I/Finalization of accounts/OW-271** दि. २३.११.२०१६.

<u>प्रस्तावना:-</u>

संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत यांचे लेखे दि. १ एप्रिल, २०१३ पासून मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिमच्या १ ते ८ नमुन्यात ठेवणेबाबतचा निर्णय घेण्यात आला होता. मात्र जिल्हा परिषद, पंचायत समिती व ग्राम पंचायत कडील सन २०१३-१४ या वित्तीय वर्षातील लेख्याच्या आढावा घेण्यात आला असता वार्षिक लेखे पूर्ण करण्यात अडचणी येत असल्याचे निदर्शनास आल्यामुळे पंचायत राज स्तरावरील वित्तीय लेखे ठेवण्यातील अडचणीचा विचार करुन जिल्हा परिषद / पंचायत समिती / ग्राम पंचायतांचे सन २०१३-१४ व सन २०१४-१५ चे लेखे मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिमच्या (MAS) पहिल्या तीन नमुन्यामध्ये व सन २०१५-१६ पासूनचे लेखे मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिमच्या १ ते ८ नमुन्यात ठेवणेबाबत संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये सूचना निर्गमित केल्या आहेत.

उपरोक्त दोन्ही संदर्भिय शासन निर्णयास अनुसरुन पंचायत राज संस्थाकडून वित्तीय लेखे मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिम (MAS) च्या १ ते ३ नमुन्यात भरण्यात येत आहेत मात्र सदर कार्यवाही

विहीत वेळेत होत नसल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अद्यापही सन २०१३-१४ व सन २०१४-१५ चे लेखे प्रलंबित आहेत.

पंचायत राज समिती व लोकलेखा समिती यांनी लेखे प्रलंबित असल्याबाबत तीव्र शब्दात नापंसती व्यक्त केली आहे. तसेच उपसचिव व प्रधान महालेखापाल (मुंबई) यांच्याशी झालेल्या बैठकीत महालेखाकारांनी प्रलंबित लेख्यांचा मुद्दा उपस्थित केला होता. त्याचप्रमाणे संदर्भ क्र.३ च्या पत्रान्वये महालेखापाल, मुंबई यांनी जिल्हा परिषदांचे लेखे प्रलंबित असून विहीत वेळेत लेखे पूर्ण करणेबाबतची कार्यपध्दती नमुद करुन संबंधितांना सुचित करण्याबाबत कळविले आहे. वित्तीय लेखे सादर करणेस होत असलेल्या विलंबाबाबत आढावा घेतला असता मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिमचे (MAS) चे १ ते ८ नमुने विविध प्रकारचे असून त्यामधील नमुना क्र. ३ ते ८ हे लेखाविषयक कामकाजाचा भाग नसल्याने सदर लेखे तयार करणेबाबत बराच कालावधी जात असून लेखे शासन स्तरावर सादर करणेस विलंब होतो.

तरी वरीलप्रमाणे लेख्याबाबतची वस्तुस्थिती विचारात घेता वित्तीय लेखे विहीत वेळेत भरणेच्या अनुषंगाने सूचना देणेबाबत परिपत्रक निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक:-**

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षातील तसेच त्यापुढील आर्थिक वर्षाचे लेखे मॉडेल अकाऊन्टींग सिस्टिमच्या १ ते ८ नमुन्यात ठेवायचे आहेत. सदर कार्यवाही विहीत वेळेत पार पाडण्याकरिता जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १३५ व १३६ मध्ये दिलेल्या वेळापत्रकाप्रमाणे कार्यवाही करणेबाबत शासन परिपत्रकान्वये खालीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत.

१) महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती अधिनियम कलम १३६ (१) नुसार आणि महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती लेखा संहिता १९६८ च्या नियम ६६-अ नुसार दिलेल्या वेळापत्रकानुसार कार्यवाही करण्यात यावी.
२) स्थानिक स्वराज्य संस्थानी शासन निर्णय दि. ०५/१०/२०१३ अन्वये लेखे मॉडेल अकाऊन्टीग सिस्टिम क्र.१ ते ८ नमुन्यातील लेखे ज्या अधिकाऱ्याने महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती लेखासंहिता,१९६८ व महाराष्ट्र जिल्हा परिषद आणि पंचायत समिती अधिनियम,१९६१ नुसार ठेवावयाचे असतात त्यांनी ते लेखे त्यांचे स्तरावर ठेवावे. सदरचे ठेवण्यात आलेले लेखे स्थानिक निधी लेखा यांचेकडून लेखापरिक्षणाच्या वेळी तपासून घ्यावेत.
३) जिल्हा परिषदांनी त्याचे वार्षिक लेखे मॉडेल अकाऊन्टीग सिस्टिम नमुना क्र. १ मध्ये तयार करुन स्थानिक निधी लेखा यांचेकडून तपासून घ्यावेत व शासनास सादर करावेत, जेणेकरुन विधीमंडळास लेखे सादर करण्यास विलंब होणार नाही.

वरीलप्रमाणे दिलेल्या वेळापत्रकानुसार लेखे बंद करुन स्थानिक लेखापरिक्षा कार्यालयाकडे सादर करुन त्याबाबत वारंवार आढावा घेऊन शासनास विहीत वेळेत सादर करावेत. लेखे शासनास सादर करणेस विलंब होत असल्यास विलंबाची कारणे स्पष्ट नमुद करुन मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या स्वंयस्पष्ट अभिप्रायाने शासनास कळवावे.

लेखे विषयक कामकाज हे विधीमंडळ कामकाजाइतकेच महत्वाचे असल्याने व लेखे विधिमंडळास सादर करण्यात येत असल्यामुळे सदर कामकाज प्राथम्याने पूर्ण करुन विहीत वेळेत व नमुन्यात शासनास सादर करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०४१२२०५६२८२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Aseem Gupta

Digitally signed by Aseem Gupta
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=RDD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=42cb1d992ceadc1f5fea3c14e1cedf9b5ea392a9c81fdbde5629e68c9158678b, cn=Aseem Gupta
Date: 2017.03.04 13:00:16 +05'30'

**(असीम गुप्ता)**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रती,

१ राज्यपालांचे सचिव.
२ मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३ मंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.
४ राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खासगी सचिव.
५ विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६ सर्व सन्माननीय विधानसभा / विधानपरिषद व संसद सदस्य.
७ भारताचे नियंत्रक व महालेखा परिक्षक, नवी दिल्ली.
८ सचिव, पंचायत राज मंत्रालय, कृषी भवन, नवी दिल्ली.
९ प्रधान लेखानियंत्रक, नवी दिल्ली.
१० प्रधान महालेखापाल-१ (लेखापरिक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
११ महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
१२ महालेखापाल-२ (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र, नागपूर.

१३ महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.

१४ सचिव, (ग्राम विकास विभाग ) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय, मुंबई.

१५ प्रधान सचिव ( वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१६ सचिव (लेखा व कोषागारे), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७ सर्व मंत्रालयीन विभाग.

१८ सर्व विभागीय आयुक्त.

१९ संचालक, NIC, नवी दिल्ली.

२० सर्व सह सचिव /उप सचिव/ अवरसचिव/कक्ष अधिकारी /ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१ संचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण भवन, नवी मुंबई.

२२ संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

२३ सहसंचालक, स्थानिक निधी लेखापरीक्षा, कोकण विभाग/ पुणे/ नाशिक/ औरंगाबाद/ अमरावती/ नागपूर.

२४ राज्य सूचना विज्ञान अधिकारी, NIC, मुंबई.

२५ विभागीय उपायुक्त (सर्व).

२६ मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).

२७ मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).

२८ सहाय्यक संचालक (स्थानिक निधी लेखा )सर्व.

२९ जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व).

३० गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व).

३१ जिल्हा सुचना व विज्ञान अधिकारी (सर्व)

३२ निवड नस्ती वित्त-६.